**अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या स्वयंसहायता बचत गट योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- माविम-२०२३/प्र.क्र.१३५/का- ९**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक: २९ ऑगस्ट, २०२३.

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३.
(२) शासन निर्णय क्र.अविवि २०२०/प्र.क्र.२५/का-९ दि.१ ऑक्टोबर, २०२०.
(३) महाव्यवस्थापक (वित्त व प्रशा), महिला आर्थिक विकास महामंडळ यांचे पत्र क्र. माविम /लेखा/२०२३/ १९८, दि. १.८.२०२३.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात वास्तव्यास असलेल्या लोकसमूहातील महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणासाठी त्यांना संघटीत करुन पुरेसा पतपुरवठा उपलब्ध करून देणे व त्यांना उद्योजकतेविषयक आवश्यक असलेली माहिती देऊन त्यांच्यामध्ये उद्योजकीय कौशल्ये विकसीत करण्याच्या हेतूने अल्पसंख्याक लोकसमुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अंतर्गत पहिल्या टप्प्यात मुंबई शहर, मुंबई उपनगर, नांदेड, मालेगाव, कारंजा, परभणी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, भिवंडी, मुंब्रा-कौसा आणि मिरज येथे अल्पसंख्याक लोक समुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास शासन निर्णय दि.२८ फेब्रुवारी,२०१२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत अल्पसंख्याक महिलांचे २४०० बचत गट निर्माण करून त्यांचे १३ लोकसंचालित साधन केंद्र ८ वर्षाच्या कालावधीत उभी राहणार आहेत. महिला आर्थिक विकास महामंडळाने ३१ मार्च, २०२० या ८ वर्षाच्या कालावधीत ३२०० बचतगट व ८ लोकसंचालीत साधन केंद्राची स्थापना केली आहे. सदर योजनेचा ८ वर्षाचा कालावधी संपूष्टात आल्याने सदर योजनेस संदर्भ क्र.२ दि.१ ऑक्टोबर, २०२० च्या शासन निर्णयान्वये ५ वर्ष (१ एप्रिल, २०२० ते ३१ मार्च, २०२५) मुदतवाढ देण्यात आली आहे.

सदर योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करून महिला आर्थिक विकास महामंडळाने उपरोक्त संदर्भीय क्र.३ दिनांक १ ऑगस्ट, २०२३ च्या पत्रान्वये, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात या योजनेंतर्गत अर्थसंकल्पीत निधी वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. महिला आर्थिक विकास महामंडळाने केलेल्या विनंतीनुसार या योजनेंतर्गत अर्थसंकल्पीत निधीपैकी वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध करून दिलेल्या तरतूदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात स्वयंसहाय्यता बचतगटाकरीता सहायक अनुदान या योजनेसाठी एकूण रु.७,००,००,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक १२ एप्रिल, २०२३ मध्ये विहीत केल्यानुसार डिसेंबर २०२३ अखेरपर्यंत सदर योजनेच्या अर्थसंकल्पीत निधीच्या ७० टक्के मर्यादेपर्यंत निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वित्त विभागाने या योजनेंतर्गत एकूण अर्थसंकल्पीत निधी रू.७.०० कोटी पैकी २० टक्के याप्रमाणात रु.१,४०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे. त्यानुसार, वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला रु.१,४०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रकम ई कुबेर प्रणालीद्वारे महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांना अदा करण्यात यावी.

३. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहिल. सदर निधीची रक्कम आहरित करण्यासाठी उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी तर अवर सचिव, अल्पसख्यांक विकास विभाग हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत याबाबतच्या वर्षनिहाय खर्चाचा लेखाविषयक तपशील ठेवण्यात यावा. ज्या बाबींसाठी अनुदान वितरित करण्यात आले आहे त्या बाबींवरच खर्च करण्यात यावा. तसेच, सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

५. यासाठी होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र.झेडई-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१०) स्वयंसहाय्यता गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र क्र ३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यास आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व अटींची व त्या सोबतच्या परिशिष्टांमधील मार्गदर्शन सूचनांची पुर्तता होत असून त्यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२९१२४९२३४०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2023.08.29 12:52:34 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा. मंत्री /राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
१०) कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
११) कक्ष अधिकारी (१४७५), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
१२) कक्ष अधिकारी (का-७,का-२ रोखशाखा) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
१३)निवडनस्ती (कार्यासन ९) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.